शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं/२२८७८/१७२९२ (भाषा २) स–पुस्तके २८३८९
दि. १६–१०–१९७८






# बालभारती

## मराठी, पुस्तक दुसरे









१९७९

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे

प्रथमावृत्ती : १९७९



कागद :
६१ × ८६ सेमी
६० जी एस एम
व्हाइट प्रिंटिंग

'ह्या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे.

मुद्रणादेश :
पी. ओ. टी. बी.
४४७१ (४,००) ७९-८०

मुद्रक :
महेंद्र. एम्. पटेल
प्रताप लिथो वर्क्स
ऑफसेट डिव्हीजन
भोसरी, पुणे, २६

प्रकाशक :
बा. गो. थोरात
नियंत्रक
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ
मुंबई 400 018

## प्रस्तावना

१९७६–७७ च्या शालेय वर्षी 'बालभारती'च्या नवीन वाचनमालेचे पहिले पुस्तक मंडळाने प्रसिद्ध केले. त्याच वाचनमालेचे इयत्ता दुसरीचे हे पुस्तक आज आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

इयत्ता पहिलीच्या 'बालभारती'शी दुसरीचे हे पुस्तक जुळते-मिळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्य तो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणी प्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षणसंस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. समितीने घेतलेल्या आस्था-पूर्वक परिश्रमाबद्दल मंडळ तिचे आभारी आहे. तसेच, अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला त्या सर्वांचे मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने या पुस्तकाची एक स्वतंत्र शिक्षक-आवृत्ती काढून शिक्षकांना पाठवार मार्गदर्शन करण्यात आले आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

बा. गो. थोरात

प्र. संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक
निर्मिती व अभ्यासक्रम
संशोधन मंडळ.

पुणे.
१३ एप्रिल १९७९
चैत्र वद्य १, १९०१

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

## अनुक्रमणिका



## १. शाळेचा पहिला दिवस

सुटी संपली. शाळा सुरू झाली. आज शाळेचा पहिला दिवस. आज अभय भेटेल. जगन भेटेल. कमलही भेटेल. आपले सगळे सोबती भेटतील. खूप बोलायला मिळेल. खूप खेळायला मिळेल.

शरद लवकर उठला. त्याने आंघोळ लवकर केली. जेवण लवकर उरकले. तो शाळेतही लवकर गेला.

त्याला अभय भेटला. जगन भेटला. कमल भेटली. बाई भेटल्या. शरदला खूप आनंद झाला.

बघता बघता शाळेचे आवार मुलांनी भरले. पाखरांसारखी मुले किलबिलू लागली. कोणी हसू लागले. कोणी गाऊ लागले. कोणी खेळू लागले. कोणी धावू लागले. सगळी शाळाच जणू बागडू लागली.

घंटा घणघणू लागली. घंटा ऐकताच मुलांना आनंद झाला. जो तो एकमेकाला हाका मारू लागला –ए अभय, ए विजय,



ए नसीम, ए मेरी, ए रामू,
ए दामू, ए अंजू, ए मंजू
..चला चला, प्रार्थनेला चला.

सगळी मुले शाळेच्या आवारात जमली. ओळींत उभी राहिली. एकदम कसे शांत झाले. प्रार्थना सुरू झाली. त्या सुरांनी सगळे वातावरण बदलून गेले.

प्रार्थना संपताच मुले रांगेने आपापल्या वर्गांत गेली. शरद वर्गात गेला. पाठोपाठ अभय आला. जगन आला. कमलही आली. काही नवी मुलेही वर्गात आली.

नवे वर्ष, नवा वर्ग, नवी पुस्तके, नवा अभ्यास. नवे सोबती, नवे खेळ. सारेच कसे नवे नवे! सारेच कसे हवे हवे! सगळेच जणू मनांत म्हणत होते—

पहिलीतून दुसरीत आलो. आता दुसरीतून तिसरीत जाणार. एकेक पायरी ओलांडून असेच आम्ही पुढे जाणार!



## २. आनंदाने गाऊ या

आनंदाने गाऊ या
रिमझिम पाऊस झेलू या
झिम झिम झरती धारा ग
भिर भिर भिरार वारा ग
भिजून गेले अंग अंग
गाऊ, नाचू, होऊ दंग
झर झर धारा झेलू ग
भर भर गिरक्या घेऊ ग
जमीन भिजते येतो गंध
झाडे, वेली, पक्षी धुंद
आनंदाने गाऊ या
रिमझिम पाऊस झेलू या

**प्रश्न :**

१. पावसात कोण-कोण भिजत आहेत ?
२. रिमझिम, झिमझिम यांसारखे काही शब्द सांगा.
३. पावसाची आणखी कोणती गाणी तुम्हांला म्हणता येतात ?
४. हे गाणे टाळ्या वाजवत तालावर म्हणा.

# ३. आमचे सोबती

आमचा कोंबडा पाहिलात का ?
दिसतो कसा गुबगुबीत, लाल लाल तुरेवाला.
उठतो भल्या पहाटेला. हाक देतो सगळ्यांना.
म्हणतो कसा –
कुकूचकूऽ....कुकूचकूऽ....ऊठ बाबू, ऊठ शकू.

पाहिलीत का आमची मनीमाऊ ?
अंग तिचे मऊ मऊ, करते कशी म्याव म्याव.
दूध पिते भरभर. फिरत असते घरभर.
कधी पाय ताणून झोपते. कधी येऊन पायांशी
खेळते. मला म्हणते –
चल रे भाऊ, दोघे मिळून दूध पिऊ.

पाहिलात का आमचा राघू ?
परसातल्या झाडावरचा खातो खाऊ.
चला चला, त्याला बघायला जाऊ.
हिरवा राघू बोलतो गोड. मागत असतो पेरूची
फोड. हिरवी मिरची, डाळिंबाचे दाणे,
आवडीने खातो चणे-फुटाणे.
ऐकत बसतो माझे गाणे. मान हलवतो आनंदाने.
खिडकीत येऊन म्हणतो मला –
चल रे जाऊ, रानीवनी भटकून येऊ.



पाहिलीत का आमची चिऊताई ?
टुणटुण करीत नाचत येते.
ठुमकत ठुमकत मला म्हणते –
चिव-चिव-चिव, चिव-चिव-चिव. नाना मला
परकर शीव. जरीच्या खणाची, मऊ-मऊ रेशमाची,
नाना मला चोळी शीव.
चिव-चिव-चिव, चिव-चिव-चिव.

आमचा मोती पाहिलाय कुणी ?
मित्र, इमानी आणि गुणी.
दूधभाकर खातो. घरभर हिंडतो. बाबांबरोबर रोज
शेतावर जातो. माझ्याशी घरात खेळत असतो.
घराची राखण करत बसतो. जरा कुठे वाजले,
की सावध होतो. कान टवकारून भुंकू लागतो.
रोज रात्री आम्हांला म्हणतो –
तुम्ही झोपा खुशाल. मी घर राखतो.



**प्रश्न :**

१. कोणकोण सोबती येथे तुम्हांला भेटतात? २. यांतला कोणता सोबती तुम्हांला आवडतो? ३. तुम्हांला आवडणारा सोबती काय म्हणतो? ४. तुमच्या आवडत्या सोबत्याचे पाच ओळींत वर्णन करा. ५. म्याव-म्याव, चिव-चिव असे तुम्हांला माहीत असलेले आणखी काही शब्द सांगा.

# ४. हुशार कावळा

एक होता कावळा.

कोळसा जसा काळा काळा. नजर त्याची चोहीकडे. मान करी इकडे तिकडे.

एकदा काय झाले —

त्याला लागली खूप भूक. त्याने खाल्लेही खूप खूप. पण पाणी नव्हते प्यायला. शोधून शोधून दमला.

इतक्यात —



त्याला दिसली घागर. गेला तिकडे भरभर. उडून बसला घागरीवर. पाणी होते तळाशी. त्याची चोच पोचावी कशी ? पाणी चोचीत येईना. काय करावे कळेना.

कावळा विचार करत राहिला. पाणी तर प्यायला हवे. मग उपाय शोधायलाच हवा. तो उपाय शोधू लागला.

उपाय काही सुचला नाही ; पण तो निराश झाला नाही. कावळा उपाय शोधत राहिला. विचार करत बसून राहिला. एकच प्रश्न त्याला पडला—काय करावे बरे आता ?

बघू लागला इकडे तिकडे. त्याला दिसले काही खडे. मग एक उपाय सुचला. पंख पसरून उडाला. त्याने एक खडा आणला. पटकन् तो घागरीत टाकला. डुबकन् वाजले.

काय गंमत! पाणी वर उडाले.



मग —

खड्यांमागून खडे आणले. भराभर घागरीत टाकले. पाणी वर चढत गेले. चोचीपर्यंत पाणी आले.

त्याला खूप खूप आनंद झाला. तो पोटभर पाणी प्याला.

हुशारीचा लाभ झाला.

प्रश्न :

१. कावळा सगळीकडे बघायचा हे कोणत्या दोन ओळींत सांगितले आहे ?

२. तो घागरीवर जाऊन बसला; पण त्याला पाणी प्यायला का मिळाले नाही ?

३. पाणी वर यावे म्हणून त्याने कोणता उपाय केला ?

४. 'हुशारीचा लाभ झाला' असे का म्हटले आहे ?





# ५. इंजिनदादा, इंजिनदादा

इंजिनदादा, इंजिनदादा, काय करता ?
डबे मी जोडतो, तुम्हांला घेतो
गावाला जातो नव्या नव्या

इंजिनदादा, इंजिनदादा, काय करता ?
कोळसा मी खातो, पाणी मी पितो.
गावाला जातो नव्या नव्या

इंजिनदादा, इंजिनदादा, काय करता ?
निशाण मी बघतो, शिटी मी फुंकतो
गावाला जातो नव्या नव्या

इंजिनदादा, इंजिनदादा, काय करता ?
झुक झुक करतो, धावायला लागतो
गावाला जातो नव्या नव्या

**प्रश्न :**

१. 'इंजिनदादा' असे कोणत्या इंजिनाला म्हटले आहे ? २. इंजिनदादा काय खातो ? ३. शिटी फुंकून निघण्यापूर्वी इंजिनदादा काय करतो ? ४. धावताना इंजिनदादा कोणता आवाज काढतो ? ५. इंजिने अनेक प्रकारची आहेत. कोण-कोणत्या प्रकारची इंजिने तुम्ही पाहिली आहेत ?

# ६. माकडाचे घर

उन्हाळा संपला. पावसाळा सुरू झाला. काळे काळे ढग आभाळात जमू लागले. वारा जोराने वाहू लागला. मुसळधार पाऊस सुरू झाला.

पिंपळाच्या झाडावर एक माकड बसले होते. या मुसळधार पावसात ते पार भिजून गेले. गार वारा त्या माकडाच्या अंगाला झोंबू लागला. माकडाच्या मनात आले – आपले घर असते तर!....मग घरात कसा छान बसलो असतो. पावसात असे भिजलो नसतो. वारा अंगाला झोंबला नसता. ते काही नाही. आता पाऊस संपताच घर बांधायचे..

थोडया वेळाने पाऊस थांबला. वाऱ्याचा जोर कमी झाला. ढगही दिसेनासे झाले. छान ऊन पडले. त्या उन्हात पानांवरचे पाण्याचे थेंब चमकू लागले. माकडाने आनंदाने अंग झाडले.



पिंपळाच्या झाडावरून उडी मारून ते चिंचेच्या झाडावर गेले. चिंचेचा आंबट-गोड पाला ते खाऊ लागले. त्यातच ते दंग होऊन गेले. या झाडावरून त्या झाडावर उड्या मारत राहिले. घर बांधायचे विसरून गेले. त्याची त्याला आठवणही राहिली नाही.

पावसाळा संपला. हिवाळा सुरू झाला. थंडी पडू लागली. हळूहळू ती वाढत गेली. कडाक्याच्या थंडीने माकड काकडू लागले. माकडाच्या मनात आले—आपले घर असते तर!... ते काही नाही. आता थंडी कमी झाली, की कामाला लागायचे. घर बांधायचे. आता आळस करून चालायचे नाही.

पण सकाळ झाली आणि ऊन पसरू लागले की माकडाला मोठी मजा वाटे. ते या झाडावरून त्या झाडावर उड्या मारू लागले. फळे खाण्यात ते दंग होऊन गेले. घर बांधायचे विसरूनच गेले.

थंडी गेली. उन्हाळा आला. हळूहळू ऊन तापू लागले. माकडाला ऊन सोसवेना. त्याच्या मनात आले—आपले घर असते तर! ... सावलीत कसा छान बसलो असतो. छे! ते काही नाही. आता ऊन कमी झाले की घर बांधायचेच. त्याने



तसा निश्चयच केला.

पण आंब्याचा मोहर झडू लागला आणि कैऱ्या दिसू लागल्या. माकड या झाडावरून त्या झाडावर उड्या मारत राहिले. कैऱ्या तोडण्यातच दंग होऊन गेले. केलेला निश्चय विसरून गेले. घर बांधायचे राहूनच गेले.

उन्हाळा संपला. पावसाळा सुरू झाला. काळे काळे ढग आभाळात जमू लागले. वारा जोराने वाहू लागला. मुसळधार पाऊस सुरू झाला. माकड भिजू लागले. त्याच्या मनात आले -- आपले घर असते तर!



प्रश्न :

१. घर बांधण्याचा विचार माकडाच्या मनात केव्हा केव्हा येई? २. माकडाला घर बांधायचा विसर का पडे? ३. माकडाचे घर बांधून का झाले नाही? ४. ठरवलेले काम पुरे करण्यासाठी काय करावे लागते?



# ७. मला शाबासकी नको

या गोष्टीला आता बरीच वर्षे झाली आहेत.

शाळेची घंटा झाली. गुरुजी वर्गात आले. आदल्या दिवशी गुरुजींनी मुलांना एक गणित सोडवायला दिले होते. वर्गात आल्याबरोबर गुरुजींनी मुलांच्या पाट्या बघायला सुरुवात केली. गुरुजींनी घातलेले गणित फार अवघड होते. त्यामुळे बहुतेक मुलांच्या पाट्या कोऱ्याच होत्या. चारपाच मुलांनीच ते सोडवण्याचा प्रयत्न केला होता; पण त्यांना ते सोडवता आले नव्हते. त्यांची उत्तरे चुकली होती. एका मुलाने मात्र ते अवघड गणित बरोबर सोडवले होते. त्या मुलाची पाटी पाहून गुरुजींना फार आनंद झाला. हातातली पाटी सर्व मुलांना दाखवत ते म्हणाले, "पहा, गोपाळने गणित बरोबर सोडवले आहे. आपल्या या वर्गातील सर्व मुलांत तो लहान आहे; पण सर्वांच्यापेक्षा तो हुशार आहे." असे म्हणून गुरुजींनी ती पाटी गोपाळच्या हाती दिली आणि त्याची पाठ थोपटत ते म्हणाले, "शाबास! गोपाळ, शाबास!"

वर्गातली सगळी मुले त्या छोट्या गोपाळकडे कौतुकाने बघू लागली. गोपाळच्या चेहऱ्यावर मात्र आनंद नव्हता. तो

दुःखी दिसत होता. काय झाले कोणास ठाऊक! एकाएकी तो रडू लागला. त्याच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहू लागल्या. सर्व मुले आश्चर्याने त्याच्याकडे बघत राहिली. सगळा वर्ग एकदम चिडीचिप झाला. काय झाले हे गुरुजींनाही कळेनासे झाले. त्यांनाही प्रश्न पडला. शाबासकी दिल्यावर गोपाळला रडू का यावे? त्याच्याजवळ जाऊन प्रेमाने त्याच्या पाठीवरून हात फिरवत गुरुजींनी विचारले, "गोपाळ, अरे तुला रडायला काय झाले?"

कसेबसे आपले रडे आवरून गोपाळ म्हणाला, "गुरुजी, मला शाबासकी नको."

गुरुजी म्हणाले, "अरे, तू एकट्यानेच गणित बरोबर सोडवले आहेस. तू शाबासकी नको का म्हणतोस?"

डोळे पुसत गोपाळ कसाबसा बोलला, "गुरुजी, ते गणित मी सोडवले नाही. मला ते येत नव्हते. वरच्या वर्गातल्या



एका मुलाकडून ते मी सोडवून घेतले आहे. मला शाबासकी नको."

गोपाळचे हे उत्तर ऐकून गुरुजींनी त्याला जवळ घेतले. त्याच्या पाठीवरून हात फिरवत ते म्हणाले, "गोपाळ, मघाशी मला जेवढा आनंद झाला होता, त्याहीपेक्षा अधिक आनंद आता मला झाला आहे. तू खरे बोललास, शाबासकी नको म्हणालास. असे कबूल करायला फार मोठे धैर्य लागते. मोठेपणी तू आपले व आपल्या शाळेचे नाव काढशील."

गुरुजींचे हे बोल पुढे खरे ठरले. खोटी शाबासकी नको म्हणणारा हा गोपाळ पुढे फार मोठा झाला. हा गोपाळ म्हणजेच भारतसेवक गोपाळ कृष्ण गोखले.



**प्रश्न :**

१. गुरुजींनी गोपाळला शाबासकी का दिली? २. शाबासकी मिळूनही गोपाळला रडू का आले? ३. गोपाळने आपल्या रडण्याचे कारण काय सांगितले? ४. 'मला शाबासकी नको' असे गोपाळने म्हटल्यावर गुरुजींना आणखी आनंद का झाला? ५. शाळेत घडलेल्या या प्रसंगावरून गोपाळचे कोणते गुण दिसून येतात? ६. याशिवाय आणखी कोणते चांगले गुण माणसाच्या अंगी असायला हवेत असे तुम्हांला वाटते?

## ८. सांग ना आई

दिवसभर पावसात असून
सांग ना आई,
झाडाला खोकला कसा
होत नाही ?

दिवसभर खेळूनसुद्धा
सांग ना आई,
वारा कसा जराही
दमत नाही ?

रात्रभर पाढे म्हणून
सांग ना आई,
बेडकाचा आवाज कसा
बसत नाही ?

रात्रभर जागूनसुद्धा
सांग ना आई,
चांदोबा झोपी कसा
जात नाही ?

दिवसभर काम करून
सांग ना आई,
तुला थकवा कसा
येतच नाही ?

**प्रश्न :**

१. मुलाने झाडाबद्दल आईला काय विचारले? २. वारा दिवसभर काय करतो? ३. बेडूक पाढे म्हणतो म्हणजे काय करतो? ४. मुलाने आईला काय विचारले? ५. असे आणखी कोणते प्रश्न तुम्हांला विचारावे असे वाटतात?

# ९. मित्रप्रेम

गुरुजी वर्गात आले. मुले उठून उभी राहिली. सगळी मुले एका आवाजात म्हणाली, "नमस्ते, गुरुजी."

"नमस्ते," असे म्हणून गुरुजींनी मुलांना बसायला सांगितले. मुले बसली. इतक्यात बाळू उभा राहिला. तो म्हणाला, "गुरुजी, आपला माधव आजारी आहे. आज त्याचे वडील आमच्या घरी आले होते. तुम्हांला देण्यासाठी त्यांनी ही चिठी दिली आहे."

बाळूने गुरुजींना ती चिठी दिली. गुरुजींनी ती वाचली. ते मुलांना म्हणाले, "माधवला ताप आला होता. आता तो बरा आहे."

गणपतने विचारले, "मग तो शाळेत का नाही आला ?"

गुरुजी म्हणाले, "डॉक्टरांनी त्याला विश्रांती घ्यायला सांगितले आहे. चार दिवसांनी येईल तो."

माधव हा वर्गातला एक हुशार मुलगा होता. खेळांतही तो भाग घेत असे. सगळ्यांशी तो मिळूनमिसळून वागे. सगळ्यांचा तो आवडता होता. त्यामुळे वर्गातल्या आणखी काही मुलांनी त्याच्या आजाराबद्दल प्रश्न विचारले.

बाळू म्हणाला, "गुरुजी, माधव माझ्या शेजारीच आहे. आज संध्याकाळी मी त्याच्या घरी जाऊन त्याला पाहून येईन."



त्यानंतर गुरुजींनी शिकवायला सुरुवात केली.

मधली सुटी झाली. मुले मैदानात आली. काही मुले बाळूभोवती गोळा झाली. गणपत त्याला म्हणाला, “शाळा सुटल्यावर माधवला भेटायला मीही येईन तुझ्याबरोबर.”

तारा म्हणाली, “आईला सांगून मी आणि कमल येऊ. थांबाल ना आमच्यासाठी? माधवसाठी मी एक मोराचे पीस आणीन.”

बाळू म्हणाला, “छान छान! तुम्ही आल्यावरच आम्ही निघू.”

एवढ्यात सदा म्हणाला, “मीदेखील येईन. परवाच मला मामाने चित्राचे एक पुस्तक दिले आहे. मी ते घेऊन येईन.”

अबदुल म्हणाला, “ए बाळू, आब्बाजाननी मला बासरीवर एक गाणे शिकवले आहे. मी माझी बासरी घेऊन येईन. माधवला वाजवून दाखवीन.”

हे सारे मित्र संध्याकाळी माधवकडे गेले. त्यांना पाहून माधवच्या आईने विचारले, “अरे, तुम्ही सगळे इकडे कुठे?”



मुले म्हणाली, "आम्ही माधवला पाहायला आलो आहो." हे ऐकून तिला फार आनंद झाला. ती त्यांना घेऊन माधवच्या खोलीत आली. ती माधवला म्हणाली, "अरे हे बघ, कोण-कोण आले आहेत तुला भेटायला!"

आपल्या मित्रांना पाहून माधवला आनंद झाला. तो अंथरुणावर उठून बसला. भेटायला आलेले सगळे मित्र त्याच्याजवळ गेले. त्याच्या आजाराची मित्रांनी विचारपूस केली. त्याला आता बरे वाटत आहे, याचा सगळ्यांना आनंद वाटला.

बाळूने घरच्या गुलाबाची फुले आणली होती. ती त्याने माधवला दिली. ताराने मोराचे पीस दिले. सदाने चित्राचे पुस्तक दिले. मित्रांनी दिलेल्या या वस्तू पाहून माधवला फार आनंद झाला. एवढ्यात अबदुल म्हणाला, "माधव, मी तुला बासरीवर एक गाणे वाजवून दाखवतो."

अबदुलने बासरीवर एक गाणे वाजवून दाखवले. गाणे संपताच मुलांनी टाळ्या वाजवल्या. माधव म्हणाला, "अबदुल, किती छान बासरी वाजवतोस तू !"

एवढ्यात माधवच्या आईने सर्वांना खाऊ दिला. थोड्या वेळाने माधवचा निरोप घेऊन सर्वजण आपापल्या घरी निघाले. माधव त्यांना म्हणाला, "तुम्ही आलात, मला किती बरे वाटले !" बाळू म्हणाला, "लवकर बरा हो. तू शाळेत नसल्यामुळे आम्हांला करमत नाही." असे म्हणून सर्वांनी निरोप घेतला.

मुले गेल्यावर आई माधवला म्हणाली, "माधव, या साऱ्यांचे तुझ्यावर किती प्रेम आहे रे! असेच एकमेकांवर प्रेम करत रहा."

मित्रांनी प्रेमाने दिलेल्या सगळ्या वस्तू माधव पुन्हा पाहत बसला. आजार विसरून त्यातच तो रमून गेला.



प्रश्न :

१. माधवला भेटायला कोणकोण गेले होते? २. माधव हा सर्व मुलांचा आवडता का होता? ३. माधवच्या मित्रांनी कोणकोणत्या वस्तू त्याला दिल्या? ४. सर्व मुले गेल्यावर आई माधवला काय म्हणाली? ५. माधवला आपल्या आजाराचा विसर कशामुळे पडला?



# १०. ऐकावे तरी कोणाचे?

एका गावात एक परीट होता. त्याचे नाव गंगाराम. त्याला एक मुलगा होता. त्याचे नाव महादेव. हे बापलेक दोघे मिळून काम करत. ओझी वाहण्यासाठी त्यांनी एक गाढव पाळले होते. गाढवावर ओझी लादून ते कधी नदीवर जात, तर कधी बाजारहाट करण्यासाठी तालुक्याच्या गावी जात.

एकदा काय झाले—बाजारहाट करण्यासाठी ते निघाले तालुक्याला. ओझे वाहून आणण्यासाठी त्यांनी गाढवालाही बरोबर घेतले. जाताना काही ओझे नव्हते. त्या दोघांबरोबर गाढव रिकामेच चालले होते. त्यांना पाहून एकजण म्हणाला, "काय गंगाराम, असे चालत काय निघालात? कोणीतरी बसा की त्या गाढवावर."

त्या माणसाचे म्हणणे गंगारामला पटले. तो आपल्या मुलाला म्हणाला, "महादू, तू बैस गाढवावर."



महादू म्हणाला, "मी चालेन, तुम्ही बसा." यावर गंगाराम बोलला, "अरे, तू लहान आहेस. तू बैस. मी चालेन. वाटल्यास थोडया वेळाने मी बसेन, मग तू चाल."



वडलांचे ऐकून महादेव गाढवावर बसला. गंगाराम मागून चालत राहिला. वाटेत एकजण महादेवाला म्हणाला, "काय रे पोरा, तुला काय अक्कल आहे की नाही? आपल्या बापाला चालायला लावून तू आपला खुशाल बसला आहेस गाढवावर!"

त्या माणसाचे हे बोल महादेवाच्या मनाला लागले. गाढवावरून खाली उतरत तो वडलांना म्हणाला, "बाबा, तो माणूस बोलला तेच बरोबर आहे. तुम्ही बसा, मी चालतो."

मुलाने आग्रह केल्यावर गंगाराम गाढवावर बसला. महादेव



पायी निघाला. एवढयात आणखी कोणीतरी ओळखीचे भेटले. ते हसून बोलले, "काय गंगाराम हे! अरे, बाप आहेस का कोण? मुलाला पायी चालवतोस आणि स्वतः खुशाल गाढवावर बसून आरामात निघाला आहेस. अरे, मुलाबद्दल काही माया?"

हे ऐकून गंगाराम चांगलाच खजील झाला. मग करावे तरी काय असा त्याला प्रश्न पडला. एकदम त्याच्या मनात आले—आपण दोघेही बसलो तर!

तो म्हणाला, "महादू, असे कर. तूही बैस माझ्यामागे. आपण दोघेही बसलो म्हणजे मग आपल्याला कोणी बोलणार नाही. कोणी नावे ठेवणार नाही. बैस, बैस."

मग दोघेही बसले गाढवावर. त्यांना वाटले आता आपल्याला कोणी बोलणार नाही.

एवढयात त्यांना काही लोक समोरून येताना दिसले. त्यांतील एकजण म्हणाला, "अरे गंगाराम, काय रे हे?"

भीत-भीत गंगारामने विचारले, "काय झाले? चुकले का काही आमचे?"



लोक हसले. त्यांतील एकजण म्हणाला, "अरे, तुम्ही माणसे आहात का गाढव?"

गंगाराम म्हणाला, "असे काय केले आम्ही?"

"अरे गंगाराम, एवढ्याशा या लहान गाढवावर कुणीतरी एकाने बसायचे का दोघांनी? तुम्हांला काही दयामाया आहे की नाही?"

हे ऐकून दोघेही खाली उतरले. ऐकावे तरी कोणाचे, हेच त्यांना कळेनासे झाले. मग महादेव वडलांना म्हणाला, "बाबा, आता असे करू या. आपणच या गाढवाला पाठीवर घेऊन जाऊ या."

कपाळाला हात लावत गंगाराम म्हणाला, "महादेवा, तरी लोक म्हणतील – अरे, तुम्ही माणसे आहात का गाढव?"



**प्रश्न :**

१. गंगाराम आणि त्याचा मुलगा कोठे निघाले होते? २. गाढवावरून महादेव खाली का उतरला? ३. गाढवावर बसलेल्या गंगारामाला लोक काय म्हणाले? ४. कोणी नावे ठेवायला नको म्हणून त्यांनी काय केले? ५. दोघांनाही गाढवावर बसलेले पाहून लोक काय म्हणाले?



# ११. विदूषक

सर्कस होती झकपक
बावळट त्यात विदूषक

काय पण होते रंगीत ध्यान
जिकडेतिकडे लुडबुड छान

मात्र त्याने केली कमाल
उडवून दिली भलतीच धमाल

उंचावरून मारली उडी
सर्वांच्यावर केली कडी

सगळ्यांशी त्याची झटापट
टपला मारल्या फटाफट

डोळे असे मिचकावले
वेडावून छान दाखवले

नाकावर त्याने ठेवले बोट
हसून हसून दुखले पोट

ध्यान – गमतीदार रूप, सोंग. सर्वांच्यावर केली कडी – सर्वांच्यापेक्षा अधिक उंचावरून उडी मारून सरशी केली. हसून हसून पोट दुखणे – फार हसू येणे.

**प्रश्न :**

१. विदूषकाने कोणकोणती कामे करून दाखवली? २. 'त्याने केली कमाल' या वाक्यावरून विदूषक हा इतरांहून अधिक सरस होता हे दिसून येते. अशी आणखी वाक्ये कोणती? ३. विदूषकाचे कोणते काम तुम्हांला अधिक आवडले? ४. विदूषकाने केलेल्या गमती हावभाव करून दाखवा.

# १२. गोगलबाई बारशाला जातात

सकाळ झाली. गोगलबाई उठल्या. आपल्या पाठीवरच्या घरातून बाहेर येऊन अंगणात आल्या. सकाळचे कोवळे ऊन खात बसून राहिल्या. तेवढ्यात त्यांची एक मैत्रीण चिऊताई समोरून येताना दिसली. तिला पाहून गोगलबाईंनी विचारले, "काय चिऊताई, आज सकाळीच कसे येणे केले ?"

चिऊताई म्हणाली, "मी आले आहे बोलावणे करायला. उदया किनई, माझ्या बाळाचे बारसे आहे. मुद्दाम तुम्हांला सांगायला आले आहे. नक्की यायचे बरे का. आणि हे पहा, लवकरच निघा जरा, म्हणजे वेळेवर पोचाल. बराय येऊ मी ? अच्छा !" असे म्हणून चिऊताई दुसरीकडे बोलावणे करायला लगेच भुर्रकन् उडून गेल्या.

दुसऱ्या दिवशी गोगलबाई अगदी लवकर उठल्या. घाईघाईने तयार झाल्या आणि लगबगीने निघाल्या. बारशाला वेळेवर जावे म्हणून त्यांनी आपला वेगही बराच वाढवण्याचा प्रयत्न केला.



खूप खूप वेळ झाला. सगळी सकाळ गेली. दुपार झाली. दुपारही गेली. संध्याकाळ झाली. तरी चिऊताईचे घर काही येईना. लांबूनही ते दिसेना. पण घर येईतोवर चालायचे. बारसे चुकवायचे नाही, असे ठरवून त्या चालतच राहिल्या.

शेवटी एकदाचे दूर अंतरावर गोगलबाईंना चिऊताईचे घरटे दिसू लागले. चिऊताईच्या घरट्याभोवती खूप गर्दी जमली होती. खूप गडबड चालली होती. गोगलबाईंना आनंद झाला. त्यांना वाटले – मंडळी दिसत आहेत, धावपळ चालू आहे, म्हणजे बारसे उरकले नव्हते खास.



चिऊताईची अगदी धांदल उडून गेली होती. समारंभाला खूप मंडळी आलेली दिसत होती. मैनाराणी आपल्या गोड आवाजाने पाहुण्यांचे स्वागत करत होत्या. पोपटदादा त्यांना

प्रेमाने फांद्यांवर बसवत होता. साळुंकीमावशी गुलाबाच्या पाकळ्यांतून सगळ्यांना मध प्यायला देत होत्या. कावळेकाकू सारखी आपली मान इकडे तिकडे करून हवे-नको पाहत होत्या. फुलपाखरे मात्र रंगीबेरंगी सुंदर कपडे घालून इकडून तिकडे व तिकडून इकडे उगीचच मिरवत होती.

शेवटी एकदाच्या हाश्शहुश्श करत गोगलबाई घरट्यापाशी पोचल्या. धापा टाकत म्हणाल्या, "पहा चिऊताई, आले की नाही बाई वेळेवर बारशाला?"

यावर जमलेली सर्व मंडळी खो खो हसू लागली. त्यांच्या या हसण्यामुळे बिचाऱ्या गोगलबाई अगदी गोऱ्यामोऱ्या झाल्या. मग चिऊताईच त्यांना म्हणाली, "अहो गोगलबाई, बारसे कुठले? ते तर मागेच झाले. आज माझ्या बाळाचे लग्न आहे. बरे झाले, तुम्ही बारशाला निघालात म्हणून निदान लग्नाला तरी वेळेवर पोचलात!"



बोलावणे करणे – आमंत्रण देणे. गोरेमोरे होणे – गोंधळून जाणे.

प्रश्न :

१. चिऊताईने गोगलबाईंना कशाचे आमंत्रण दिले होते? २. गोगलबाई एकसारख्या चालतच का राहिल्या? ३. गोगलबाई चिऊताईच्या घरी पोचल्या तेव्हा तेथे कायकाय चालले होते? ४. चिऊताई भेटताच गोगलबाई तिला काय म्हणाल्या? ५. चिऊताई गोगलबाईंना काय म्हणाल्या?



# १३. माझा खाऊ मला द्या

गुरुजींना वर्गातल्या सगळ्या मुलांचे चेहरे आज आनंदी दिसत होते. एवढ्यात वर्गनायक विनायक उठून म्हणाला, "गुरुजी, आज आम्ही सगळा वर्ग स्वच्छ केला. मी नेमून दिलेले काम प्रत्येकाने नीट केले आहे."

मनोहर म्हणाला, "सगळा केरकचरा नेऊन आम्ही टोपलीत टाकला."

कोपऱ्यात ठेवलेल्या त्या टोपलीकडे गुरुजी गेले. ती टोपली तुडुंब भरलेली दिसली. ते पाहून गुरुजी म्हणाले, "मुलांनो, तुम्ही सगळा वर्ग स्वच्छ केला, हे छान केले; पण एका गोष्टीचे मात्र मला वाईट वाटते."

हे ऐकताच मुले एकमेकांकडे पाहू लागली. गुरुजींना कशाचे वाईट वाटत असावे याचे सर्वांना कोडे पडले. आपले काय चुकले हेच कळेनासे झाले.

कमल म्हणाली, "गुरुजी, आम्हांला काम करावे लागले म्हणून तुम्हांला वाईट वाटले ना?"

गुरुजी म्हणाले, "छे, छे! तसे मुळीच नाही. आपले काम आपणच करायला हवे. आपला वर्ग तुम्ही स्वच्छ केला याचा मला अभिमानच वाटला. पण एक गोष्ट मला खटकली."



गुरुजींना कोणती गोष्ट खटकली हेच मुलांना समजेनासे झाले. शेवटी विनायक उठून उभा राहून म्हणाला, "गुरूजी, आमचे काय चुकले?"

गुरुजी म्हणाले, "विनायक तू वर्गनायक आहेस. तूच मला सांग. त्या केराच्या टोपलीत कायकाय आहे?"

विनायक म्हणाला, "केर, कचरा, धूळ, केळ्यांच्या साली, कागदाचे बोळे यांनी ती भरलेली आहे."

गुरुजी म्हणाले, "ठीक आहे. धूळ कोठून येते?"

विनायक म्हणाला, "धूळ वाऱ्याने येते."

गुरुजी म्हणाले, "बरोबर आहे. वाऱ्याने धूळ येणार, ती काढायलाच हवी. पण टोपलीत केळ्यांच्या साली, कागदाचे बोळे आणि शेंगांची टरफले दिसतात ती आभाळातून आली का?"

गुरुजींना कशाचे वाईट वाटत होते ते मुलांना कळले.

आपली चूकही त्यांना समजली. विनायक म्हणाला, "गुरुजी, यापुढे अशी घाण आम्ही करणार नाही."

गुरुजी म्हणाले, "छान! तुमची चूक तुम्हांला कळली. याचा मला फार आनंद वाटला." असे म्हणून ते शिकवू लागले.

दुसऱ्या दिवशी गुरुजी वर्गात आले. त्यांचे लक्ष केराच्या टोपलीकडे गेले. त्या टोपलीवर त्यांना एक पाटी दिसली. सुरेख अक्षरांत ती रंगवलेली होती. त्यावर लिहिले होते— 'माझा खाऊ मला दया.'




गुरुजी हसून म्हणाले, "विनायक, ही कल्पना कुणाची?" विनायक म्हणाला, "ही पाटी कमलने तयार केली आहे."

गुरुजी म्हणाले, "कल्पना फार छान आहे. आपण टाळ्या वाजवून कमलचे कौतुक करू या."

वर्गातल्या सर्वच मुलांनी टाळ्यांचा कडकडाट केला.

**प्रश्न :**

१. वर्गातल्या सर्व मुलांचे चेहरे आज आनंदी का दिसत होते? २. केराची टोपली पाहून गुरुजी काय म्हणाले? ३. आपली चूक कळून आल्यावर गुरुजींना विनायक काय म्हणाला? ४. 'यापुढे अशी घाण आम्ही वर्गात करणार नाही,' असे विनायकाने सांगितल्यावर गुरुजी काय म्हणाले? ५. कौतुक करण्यासारखी कोणती गोष्ट कमलने केली होती?



# १४. पाहुणे



घरापुढे
थांबला टांगा.
पाहुणे कोण
आले सांगा.
काका नि काकी
मामा नि मावशी
सगळेच आले
एकाच दिवशी.
एवढे पाहुणे
कशासाठी ?
अहो, बाळाच्या
बारशासाठी !

घरापुढे
थांबला टांगा.
आणखी कोण
आले सांगा.
एक विदूषक
एक ससा
दोन पऱ्या
खऱ्या-खुऱ्या.
एवढे पाहुणे
कशासाठी ?
अहो, बाळाशी
खेळण्यासाठी !

**प्रश्न :**

१. टांग्यातून कोण-कोण पाहुणे आले? २. काका, काकी, मामा, मावशी हे सगळे कशासाठी आले होते? ३. विदूषक, ससा आणि पऱ्या हे पाहुणे कशा-साठी आले होते? ४. आईच्या भावाला 'मामा' म्हणतात. तसे मावशी, आत्या, ताई, दादा आणि काका असे कोणाकोणाला म्हणतात?

# १५. आईस पत्र

करजगाव, ता. अचलपूर,
जिल्हा अमरावती.
दिनांक : १५-१०-१९७८

ती. सौ. आईस,

शिरसाष्टांग नमस्कार.

मामाबरोबर मी आणि सगुणा एस्‌टीने इकडे आलो. सुखरूप पोचलो. काळजी नसावी.

अग, मोटार सुरू झाली आणि गार वारा खाऊन सगुणा लगेच डुलक्या घ्यायला लागली. मामाच्या आणि माझ्यामध्ये ती बसली होती म्हणून बरे झाले. नाहीतर खालीच कलंडली असती.

रस्त्याने फार मजा आली. झाडे आमच्या विरुद्ध दिशेने पळताना दिसत होती. नुसती झाडेच नाहीत, तर शेतातील पिके आणि झोपड्याही पळत होत्या. सगुणा झोपल्याने तिला काही हे पाहता आले नाही.

मामाचे गाव आले. आम्ही गाडीतून उतरलो. हे कोण, म्हणून गावकरी आमच्याकडे पाहत होते. 'भाचरे दिवाळीला आली आहेत' असे मामा प्रत्येकाला सांगत होता. मी पाचवीत आहे आणि सगुणा दुसरीत आहे हे कळून इथल्या सर्वांना फार कौतुक वाटले.



घरी आल्या-आल्या आम्ही हातपाय, तोंड धुतले. कपडे बदलले. मग आजी, आजोबा आणि मामी यांच्या पाया पडलो. आजोबांनी पाठीवर हात फिरवून आशीर्वाद दिला. आजीने कुरवाळून पोटाशी धरत म्हटले, 'केवढे मोठे झालात रे बाळांनो!' आणि मग कंबरेचा बटवा काढून खडीसाखरेचा एकेक खडा आमच्या हातावर ठेवला. एवढ्यात मामीने फराळाच्या बशा आणून ठेवल्या. पण आमचे लक्ष अंगणात खेळणाऱ्या मुलांकडे लागले होते. मुले एका कोपऱ्यात किल्ला तयार करत होती. आम्ही त्यात सामील झालो.

संध्याकाळ केव्हा झाली आणि अंधार केव्हा पडला हे मुळी कळलेच नाही. मग आम्ही हातपाय धुतले. मामीने ओटीवर पणत्या लावून ठेवल्या होत्या. आम्ही 'शुभं करोति' म्हटले.

रात्रीचे जेवण झाल्यानंतर आजीच्या भोवती आम्ही रेंगाळत राहिलो. सगुणा म्हणाली, "आजी, आजी, गोष्ट सांग ना."

आजी गोष्ट सांगायला लागली. ऐकता-ऐकता सगुणा पेंगुळली. मलाही केव्हा झोप लागली ते समजलेच नाही.

पहाटे जाग आली ती कोंबड्याच्या आरवण्याने. पक्ष्यांचा किलबिलाटही ऐकू येत होता. आम्ही उठलो. सगळे उरकले. धारोष्ण दूध प्यालो. अग, काय छान लागले!

आणि आता मामाने पत्र लिहायला बसवले आहे. पत्र चांगले मोठे लिही—असे तो म्हणाला.

आम्ही तुमची खूप खूप वाट पाहत आहोत. लौकर लौकर या. ती. बाबांना साष्टांग नमस्कार. टिपू आणि मनी यांना इकडे येताना कुठे ठेवाल? त्यांना आमची आठवण येते का?

तुझा लाडका,

बाबू



भाचरे – बहिणीची मुले. लख्ख – स्वच्छ. शुभं करोति – दिवे-लागणीच्या वेळी दिव्यापुढे म्हणायची प्रार्थना. धारोष्ण – गाय अगर म्हैस यांचे नुकतेच काढलेले दूध.

**प्रश्न :**

१. बाबू कोणत्या गावाला गेला होता? २. एस्टीने जाताना वाटेत कोण-कोणत्या गमती झाल्या? ३. मामाच्या घरी आल्या-आल्या बाबू आणि सगुणा यांनी काय केले? ४. अंगणात जमून मुले काय करत होती? ५. त्यांना पहाटे कशाने जाग आली?

# १६. सुगीचे दिवस

दिवाळी गेली. सुगीचे दिवस जवळ आले. थंडी कडाक्याची पडू लागली. या थंडीने लोकांचे ओठ फुटू लागले. टाचांना भेगा पडू लागल्या. सकाळ-संध्याकाळ जाळ करून लोक शेकत बसू लागले. थंडीचा कडाका वाढला. ज्वारीच्या कणसांत दाणा भरू लागला. टपोरी कणसे भरदार दिसू लागली. वाऱ्याबरोबर ती डुलू लागली. हुरडा सुरू झाला. आज या शेतावर तर उद्या त्या शेतावर लोक हुरडा खायला जाऊ लागले.



पाखरांचे थवेच्या थवे पिकांवर येऊन बसू लागले. पाखरे येऊ नयेत म्हणून शेतांत बुजगावणी उभारली जाऊ लागली. पाखरांना हाकलण्यासाठी शेतकरी गोफणी फिरवू लागले. तोंडाने हा-हा-हा करून ओरडू लागले. याच्या जोडीला डबेही वाजू लागले. या आरडाओरडण्याने गावचे शिवार घुमू लागले. भल्या पहाटेपासूनच शेते अशी गजबजून जाऊ लागली. पाखरांचे थवे या पिकांवरून त्या पिकांवर उडू लागले.

हुरडयाचे दिवस संपत आले. ज्वारीची पाने बुडख्यापासून शेंडयापर्यंत वाळत चालली. हिरवे शिवार पिवळे दिसू लागले.

शेतांतील भुईमुगाच्या वेलांचा रंगही बदलू लागला. त्यांची हिरवी पाने करडी दिसू लागली. शेंगांची काढणी सुरू झाली.



गावातील बायकामुले शेंगा वेचायला जाऊ लागली. रोज संध्याकाळी शेंगांनी भरलेल्या दुरडया घरी येऊ लागल्या.

भाजलेल्या शेंगांतील तो मऊ सुरकुतलेला दाणा पुरणागत लागू लागला.

शेंगांची काढणी संपत आली आणि जोंधळ्याची कापणी सुरू झाली. ऐन सुगीची गडबड दिसू लागली. बायका-मुले, म्हातारी-कोतारी सारी याच कामात दंग होऊन गेली. गावात कोणी दिसेनासे झाले. दिवसभर घरांना कुलपे लागू लागली.

शेताशेतांतून अशी कापणी सुरू झाली. विळे लागून कोणाची बोटे कापू लागली. सड लागून कोणाच्या पायाला जखमा होऊ लागल्या. तात्पुरती चिंधी बांधून लोक तशीच कामे करत होते. कुणाची कापणी चालू होती, कुणाची खुडणी



सुरू होती. कुणी खुडलेली कणसे खळ्यात आणून टाकत होते. खळ्यातल्या तिवड्याभोवती बैल फिरत होते. त्यांच्या पायांखाली कणसे रगडली जात होती. कुणाची अशी मळणी सुरू होती, कुणी या मळलेल्या दाण्यांना वारे देत होते. कुणी हे दाणे पोत्यांत भरत होते, कुणी ही भरलेली पोती गाडीत घालून घरी नेत होते. कामांची अशी धांदल सुरू होती. सुगीशिवाय दुसरे काही सुचत नव्हते. सुगी अशी ऐन बहरात आली होती.



**सुगी** – पिकांच्या काढणीचा काळ. **शिवार** – गावाभोवतालची सीमेपर्यंतची शेत-जमीन. **सड** – कापलेल्या ज्वारीचा टोकदार बुडखा. **खळे** – धान्याची कणसे मळण्याची किंवा झोडण्याची वाटोळी जागा. **मळणी** – कणसे झोडपून किंवा जनावरांकडून तुडवून धान्य काढणे. **तिवडा** – खळ्याच्या मध्यभागी असलेला लाकडी उभा खांब किंवा मेढ.

**प्रश्न :**

१. सुगीचे दिवस जवळ आले, तेव्हा हवा कशी होती? २. पाखरांना हाक-लण्यासाठी शेतकरी कायकाय करू लागले? ३. दिवसभर घरांना कुलपे का लागू लागली? ४. ऐन सुगीच्या दिवसांत एकाच वेळी कोणकोणती कामे चालू होती? ५. ज्वारीच्या कापणीपासून धान्य घरात येईपर्यंत कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागतात?



## १७. उघड पावसा

उघड पावसा ऊन पडू दे
उडू बागडू हसू खेळु दे
कळी उमलु दे, फुला फुलू दे,
पाने वाऱ्यामध्ये डुलू दे
टपटप खाली थेंब पडू दे,
तालावर त्या मला नाचु दे
उंच चालल्या घारी वरती,
बगळे रांगा धरुनी उडती
ढगांत भरभर रंग बदलती,
पाठशिवणिचा खेळ खेळु दे

बसे फुलावर फूलपाखरू,
मला सांगते मौज चल करू
थांब पावसा ऊन पडू दे,
गाता गाता मला खेळु दे
उघड पावसा ऊन पडू दे
उडू बागडू हसू खेळु दे

**प्रश्न :**

१. 'पाऊस जाऊन ऊन पडावे' असे का म्हटले आहे? २. कशाच्या तालावर मला नाचू दे, असे म्हटले आहे? ३. घारी, बगळे आणि ढग यांना पाहून मुलाला काय करावेसे वाटते? ४. फुलपाखरू मुलाला काय सांगते?



# १८. कुंभाराची कला

हा पहा तुकाराम कुंभाराचा वाडा. वाड्यासमोर हे केवढाले रांजण लावले आहेत! तशीच ती पहा, सोप्यावर कितीतरी गाडगी-मडकी रचून ठेवलेली दिसतात.

तुकाराम नेहमी आपल्या कामात गढलेला असतो. मातीचा गारा घेऊन तो आपल्या चाकाजवळ बसतो. मळलेल्या मातीचा एक भला मोठा गोळा तो त्या आडव्या चाकाच्या मध्यावर ठेवतो. मग काठीने ते चाक तो फिरवू लागतो. चाक गरगर फिरू लागले की बघताबघता त्या चिखलाच्या गोळ्याला आकार येऊ लागतो. माठ, कुंड्या, रांजण असा हवा तो आकार तो त्या गोळ्याला देतो.

पोळ्याचा सण आला की तुकाराम मातीचे बैल तयार करू लागतो. तयार झालेले बैल तो रांगेने लावून ठेवतो. मग गेरूचा रंग देऊन तो त्यावर चुन्याचे पांढरे ठिपके देतो. असे रंगवलेले बैल किती हुबेहूब दिसतात! पोळ्याचा सण संपला की हेच बैल मुलांना खेळायला मिळतात.

श्रावण महिना आला की तो गणपती तयार करू लागतो.

लहान-मोठे असे कितीतरी प्रकारचे गणपती तो तयार करतो. गणेशचतुर्थी जवळ आली की गणपती घ्यायला लोक तिथे येतात. तासन् तास ते बघतच राहतात. त्यांतून कोणती मूर्ती निवडावी असा त्यांना प्रश्न पडतो.

दिवाळी जवळ आली की तुकाराम पणत्या करू लागतो. त्याच्या वाड्याचा सोपा या पणत्यांनीच भरून जातो. दिवाळीत या पणत्या घरोघर तेवताना दिसतात. रात्री त्यांना दुरून पाहिले की चांदण्याच चमकत आहेत असे वाटते.

दिवाळी संपली की तुकाराम संक्रांतीच्या तयारीला लागतो. संक्रांतीला स्त्रिया सुगडांची वाणे देतात. त्यासाठी त्याला कितीतरी सुगडे तयार करावी लागतात.

संक्रांत झाली की उन्हाळ्याची चाहूल लागते. ऊन तापू लागले, की लोकांना गार पाणी प्यावेसे वाटते. त्यासाठी



तुकाराम माठ आणि रांजण करू लागतो.

चैत्रात त्याच्या गावची जत्रा भरते. तुकाराम त्यासाठी मातीची चित्रे तयार करतो. आपल्या चित्रांचे एक दुकान तो या जत्रेत थाटतो. अनेक प्रकारच्या मूर्ती, बाहुल्या, पशु-पक्षी यांनी हे दुकान गजबजलेले दिसते. तुकारामाची कला या चित्रांतून पाहायला मिळते. ती पाहून किती आनंद होतो!

याशिवाय घरांच्या बांधकामासाठी तो विटाही तयार करतो. विटांचे साचे घेऊन तो भराभर विटा पाडतो. या कामात त्याची बायको व मुले त्याला मदत करतात. भाजलेल्या तांबडयालाल विटा तो रचून ठेवतो. रचलेल्या या विटा किती सुंदर दिसतात!

तुकाराम लोकांच्यासाठी असा सतत वर्षभर राबत असतो.



गारा – मळून तयार केलेली माती सुगड – लहान मडके.

प्रश्न :

१. मातीच्या गोळ्याला हवा तो आकार देण्यासाठी तुकाराम काय करतो? २. मातीचे बैल तो केव्हा तयार करतो? ३. श्रावण महिन्यात तो कोणत्या कामात गढून जातो? ४. कोणत्या सणासाठी तुकाराम सुगडे तयार करतो? ५. कोणत्या सणासाठी तो पणत्या तयार करतो? ६. लोकांच्या उपयोगासाठी तुकाराम आणखी कायकाय करतो? ७. तुकारामाची कला कोणकोणत्या वस्तूंत विशेष दिसून येते.

# १९. पुरी हौस फिटली



एक होता विदूषक. तो नेहमी काहीना काही गमती करी आणि आपल्या राजाला हसवी.

एकदा विदूषकाच्या मनात आले – रोज रोज मी गमती करतो. राजाला सारखे हसवतो. एवढे करूनही मला कोणीच मोठा म्हणत नाही. सगळे मला पाहून हसतात. ते काही नाही. मी आता मोठा सेनापतीच होणार.

विदूषक राजाकडे जाऊन म्हणाला, "राजेसाहेब, मला सेनापती व्हायचे आहे."

राजाला वाटले की विदूषक नेहमीसारखे काहीतरी गमतीने बोलत आहे. राजाही मग थट्टेने म्हणाला, "ठीक आहे. केले तुला सेनापती!"

विदूषक म्हणाला, "तर मग दया मला एक तलवार!"

राजाला गंमत वाटली. त्याने त्याला एक भली मोठी तलवार दिली. विदूषक तलवार घेऊन मोठया खुशीत निघाला. तोच राजा म्हणाला, "सेनापतीसाहेब, कोठे निघालात?"

"थेट लष्करात!"

"थोडे मागे फिरा. आजची रात्र तुम्ही राजवाड्यावर पहारा करा. उदया सकाळपासून खुशाल सेनापती व्हा."

"आज्ञा महाराज!" असे म्हणून विदूषकाने राजाला ऐटीत सलाम केला. राजा त्याला म्हणाला, "सेनापतीसाहेब, तुम्ही तुमची तलवार नीट सांभाळा बरे. तलवार गमावलीत तर फासावर जावे लागेल. माझा नियम मोठा कडक आहे!"

"जी सरकार! तलवार गमवायला मी काय वेंधळा आहे? हा सेनापती योग्य ती काळजी घेईल." असे म्हणत विदूषक पहाऱ्यावर हजर झाला.

रात्रीचे बारा वाजले. विदूषक पहारा करून कंटाळला. जांभया देत आडवा झाला. हळूहळू घोरूही लागला. तेवढ्यात राजा तेथे आला. विदूषकाला घोरताना पाहून त्याला हसू आले. विदूषकाची चांगली फजिती करावी असा विचार त्याच्या मनात आला. विदूषकाची तलवार राजाने हळूच काढून घेतली आणि तो गुपचूप निघून गेला.

पहाट झाली. विदूषकाला जाग आली. त्याने कमरेला चाचपून पाहिले. तेथे तलवार नव्हती. आपल्याला आता



फासावर जावे लागणार या विचाराने तो चांगलाच घाबरला. त्याला काही सुचेना. सकाळ होण्यापूर्वी काही खटपट करून त्याने एक लाकडी तलवार बनवून घेतली.

थोडया वेळाने राजाचे बोलावणे आले. जसे काही घडलेच नाही, अशा थाटात मोठ्या ऐटीने विदूषक राजाकडे गेला.

राजाने विचारले, "काय सेनापतीसाहेब, काल पहाऱ्यावर काही गडबड, घोटाळा नाही ना झाला?"

"छे:! काही नाही. रात्रभर जागून मी पहारा करीत होतो."

राजा हसला. त्याने पुन्हा विचारले, "काहीच नाही? पहा बरे नीट आठवून."

इतक्यात काही सैनिक राजवाडयात आले. त्यांनी एका दरोडेखोराला धरून आणले होते. राजाला वाटले – विदूषकाची थोडी गंमत करावी.

राजा म्हणाला, "सेनापती, काढा आपली तलवार आणि ह्या दरोडेखोराचे दोन्ही हात तोडून टाका."



आता आली का पंचाईत! विदूषक झटकन म्हणाला, "राजेसाहेब, ज्या तलवारीने लढाई करायची, पराक्रम गाजवायचा त्या तलवारीने अशा साध्या माणसाला मारायचे? या तलवारीचा हा अपमान आहे!"

राजा गालांतल्या गालांत हसून म्हणाला, "शाब्बास! सेनापती, हा या तलवारीचा अपमान होतो काय? मग काय आमच्यासारख्यांना मारणार?"

"छे! छे! राजेसाहेब, तुम्हांला कोण मारील? तलवार घेऊन जो तुमच्यापुढे येईल त्याची तलवार लाकडाची होईल! आता हेच पहा ना–" असे म्हणत त्याने आपल्या कमरेची तलवार म्यानातून बाहेर काढली आणि ती राजाच्या पायांवर ठेवली.

पायांवर ठेवलेली विदूषकाची तलवार राजाने उचलून हातात घेतली. त्याने विदूषकाची चतुराई ओळखली. राजा म्हणाला, "सेनापतीसाहेब, आपण फार हुशार आहात. आम्ही तुमच्यावर खूष आहोत. पण इतका हुशार सेनापती आम्हांला नको. तुम्ही आपले आमचे विदूषक म्हणूनच रहा. तेच बरे!"

**प्रश्न :**

१. विदूषकाला सेनापती व्हावे असे का वाटले? २. तो सेनापती होताच राजाने त्याला काय बजावले? ३. तो पहाऱ्यावर असताना राजाने त्याची काय गंमत केली? ४. दरोडेखोराचे हात तोडण्यास विदूषक का तयार झाला नाही? ५. विदूषकाची चतुराई कोणत्या गोष्टीत दिसून येते?

# २०. चल्ल ग सई

चल्ल ग सई
कुठं ग बाई ?

मळ्याच्या वाटेवर
नदीच्या काठावर
वडाच्या पारंब्या
तिथं ग बाई !



चल्ल ग सई
कुठं ग बाई ?

पिंपळाच्या झाडावर
माकडाच्या वस्तीवर
झोंबी चाल्ले
तिथं ग बाई !

चल ग सई
कुठं ग बाई ?

आंब्याच्या पानांआड
कोकिळाताई
कुहु कुहु गाई
तिथं ग बाई !





चल ग सई
कुठं ग बाई ?

गाईच्या गोठ्यात
भुरकं वासरू
टुकु-टुकु बघतंय
तिथं ग बाई !

सई – सखी, मैत्रीण.

पारंब्या – वडाच्या झाडाची फांद्यांवरून खाली लोंबणारी मुळे.

प्रश्न :

१. एक मुलगी आपल्या मैत्रिणीला कुठेकुठे चल असे म्हणते ? २. पिंपळाच्या झाडावर कोणाची झोंबी चालते ? ३. आंब्याच्या पानांआड बसून कोण गाते ? ४. भुरके वासरू कसे बघते ?

# २१. एकीचे बळ

शाळा सुटली. मुले वर्गांतून बाहेर पडली. मधू आपल्या मित्रांना म्हणाला, "मी चेंडू आणला आहे. आपण मैदानावर जाऊन खेळूया का?"

मधूच्या मित्रांना आनंद झाला. शरदने तर आनंदाने टाळ्या वाजवल्या. जागच्या जागी उड्या मारत रमेश म्हणाला,

"काढ, काढ. चेंडू काढ."

चेंडू काढण्यासाठी मधूने आपल्या पिशवीत हात घातला. त्याला चेंडू काही सापडेना. चेंडू पिशवीत नव्हता.

मधूचा चेहरा रडवेला झाला. तो म्हणाला, "या पिशवीतला चेंडू काय झाला?"

शरद म्हणाला, "असेल रे, नीट बघ."

पिशवी नीट पाहून मधू बोलला, "नाही रे. चेंडू कुणीतरी काढून घेतलेला दिसतो."

एवढ्यात गणू जवळ येत म्हणाला, "काय रे मधू, काय झाले?"

मधू म्हणाला, माझा चेंडू सापडत नाही. आजूबाजूला पाहत गणू हळू आवाजात म्हणाला, "माझे नाव कुणाला सांगणार नसाल तर सांगतो."

मधू म्हणाला, "सांग, सांग."



गणूने सांगितले, "तुझा चेंडू संजयने घेतला आहे. मधल्या सुटीत तुझ्या पिशवीतून तो घेत असताना मी पाहिले आहे." यावर मधू म्हणाला, "मग तू त्याला काही बोलला नाहीस?"

गणू म्हणाला, "मी काय बोलणार? तो किती आडदांड आहे माहीत नाही?"

एवढ्यात वर्गातील आणखी काही मुले तिथे आली. त्यांतील दोघातिघांनी संजयनेच चेंडू घेतला आहे असेच सांगितले. मग शरद म्हणाला, "चला तर मग, आपण जाऊन त्याला विचारू या."

मधू म्हणाला, "नको रे बाबा, तो फार दांडगट मुलगा आहे. त्याच्याकडे जायला नको. माझा चेंडू गेला तरी चालेल."

शरद म्हणाला, "नाही, नाही. असे भिता कामा नये. तो दांडगट झाला म्हणून त्याचे वाटेल ते खपवून घ्यायचे का?" आज त्याने मधूचा चेंडू घेतला. उदया तो आपली खोडी

करील. आपण सगळे मिळून एक होऊ. मधूचा गेलेला चेंडू आपण परत मिळवू. त्याने सरळपणाने आपल्याला चेंडू दिला नाही, तर मग गुरुजींकडे जाऊ."

शरदच्या या बोलण्याने सगळ्यांना धीर आला. रमेश म्हणाला, "बरोबर आहे. आपण सर्व एक होऊ."

शंकर म्हणाला, "ही दांडगाई चालू देता कामा नये. आपण त्याला जाऊन विचारू."

सगळेच तयार झाले. एवढ्यात संजय समोरून येताना दिसला. ही सगळी मुले त्याच्याकडे गेली.

शरद पुढे होऊन म्हणाला, "संजय, तू मधूचा चेंडू घेतला आहेस का?"

संजय म्हणाला, "मुळीच नाही. आणि तुम्ही रे मला कोण विचारणार?"



शरद म्हणाला, "आम्ही मधूचे मित्र म्हणून तुला विचारतो."

गणू म्हणाला, "नाही काय म्हणतोस? याचा चेंडू घेताना तुला मी पाहिले आहे." शंकरने असेच सांगितले. ही सर्व मुले एक झाली आहेत, हे पाहून संजय घाबरला. तो म्हणाला, "हो, हो. मी घेतला आहे." असे म्हणून त्याने मुकाट्याने चेंडू काढून दिला. तो चेंडू उंच उडवत शरद म्हणाला, "एकीचे बळ, मिळते फळ."

मधू संजयला म्हणाला, "तूही ये ना आता आमच्याबरोबर खेळायला. आपण सगळे मिळून खेळू."

संजय म्हणाला, "मी अशी खोडी पुन्हा करणार नाही. मी शरदची पेन्सिल घेतली आहे. तीपण देतो."

संजयने पेन्सिलही काढून दिली. ती घेत शरद म्हणाला, "आजपासून संजयही आपला मित्र. चला, आपण सारे खेळू या."



**प्रश्न :**

१. शाळा सुटल्यावर मधू आपल्या मित्रांना काय म्हणाला? २. मधूचा चेहरा रडवेला का झाला? ३. संजयने चेंडू घेतला आहे हे कळल्यावर शरद काय म्हणाला? ४. संजयने चेंडू परत का दिला? ५. चेंडू उंच उडवत शरद काय म्हणाला?

# २२. वाफेची शक्ती



सकाळची वेळ होती. खूप थंडी पडली होती. छोट्या जेम्स वॉटला केव्हा एकदा चहा घेईन असे झाले होते. त्याने शेगडी पेटवली. थोड्याच वेळात निखारे चांगले फुलले. जेम्सने किटलीत चहाचे आधण ठेवले.

जेम्स नेहमी कसल्या ना कसल्या विचारात गढून जात असे. आताही तसेच झाले. किटलीत पाणी उकळत ठेवल्याचे तो विसरूनच गेला. तेवढ्यात शेगडीवरील किटलीचा आवाज होऊ लागला. विचारात गढलेल्या जेम्सचे तिकडे लक्ष गेले. किटलीचे झाकण थडथडताना त्याला दिसले. झाकण मध्येच थोडेसे उचलले जाई आणि पुन्हा खाली बसे. झाकण उचलले गेले की वाफ 'फुस्स' करून बाहेर पडे आणि ती निघून जाताच झाकण पुन्हा खाली बसे.

हे पाहून जेम्सच्या मनात आले – अरे, येथे तर वारा नाही की कोणी नाही. हे झाकण कशाने बरे खालीवर होत असेल? कोण बरे ते हालवत असेल? इतक्यात किटलीतून वाफ एकदम जोराने उसळली. त्याबरोबर किटलीचे झाकण थडथडले आणि खाली पडले. जेम्सला मोठे नवल वाटले. त्याने

चटकन झाकण उचलून ते पुन्हा किटलीवर ठेवले.

थोड्या वेळाने पुन्हा वाफ उसळली. पुन्हा झाकण थडथडले आणि खाली पडले. वाफेचा आणि झाकणाचा हा खेळ जेम्स बघतच राहिला. हा खेळ बघता-बघता त्याला एक नवी गोष्ट समजली. वाफेच्या अंगी शक्ती असली पाहिजे. शक्ती नसेल तर झाकण उडेल कसे?

जेम्स याच एका विचारात गढून गेला. किटली ती एवढीशी. तिच्यात वाफ ती कितीशी असणार? पण तीच कोंडली की झाकण ताडकन उडवून देते. मग मोठी किटली घेतली तर? मोठी किटली घेऊन जास्त वाफ कोंडली, तर मोठे झाकण उडून पडेल?– जेम्सला अशा नव्या नव्या कल्पना सुचू लागल्या. वाफेत जर शक्ती आहे तर त्या शक्तीने गाडी का ओढता येऊ नये? घोडे गाडी ओढतात म्हणजे तरी ते काय करतात? आपल्या शक्तीनेच ती ओढतात ना? मग खूप खूप वाफ कोंडली, तर खूप खूप शक्ती तयार होईल. तशी ती तयार झाली तर त्या शक्तीने गाडी रेटता येईल, हलवता येईल, पळवता येईल. त्यासाठी खूप वाफ कोंडली पाहिजे. जेम्स मनात म्हणाला, "मी आता वाफेचे एक यंत्रच तयार करतो."

वाफेच्या यंत्राशिवाय जेम्सला दुसरे काही दिसेचना. त्याला जेवणखाणही सुचेना. दिवस-रात्र तो याच एका गोष्टीच्या मागे

लागला. त्याच एका कामात तो गढून गेला.

काही दिवस गेले, महिने लोटले. अखेर एक दिवस वाफेचे यंत्र तयार झाले. जेम्सला अतिशय आनंद झाला.

इंग्लंडमधल्या जेम्स वॉटला वाफेच्या शक्तीचा शोध लागला. साऱ्या जगाला त्याने एक फार मोठी शक्ती मिळवून दिली. कारण याच शक्तीवर आज आगगाड्या धावतात. आगबोटी चालतात. कारखान्यांतील मोठमोठ्या यंत्रांची चाकेही फिरतात. अशी कितीतरी कामे होतात. वाफेची ही शक्ती म्हणजे जेम्स वॉटने जगाला दिलेली एक फार मोठी देणगीच होय!



**प्रश्न :**

१. जेम्स चहा प्यायचे विसरूनच गेला—ते का? २. वाफेच्या अंगी शक्ती असली पाहिजे हे जेम्सला कशामुळे कळले? ३. वाफेत शक्ती असते हे समजल्यावर जेम्सला कोणकोणत्या कल्पना सुचू लागल्या? ४. वाफेच्या शक्तीवर कोणकोणती कामे चालतात असे या पाठात सांगितले आहे?



# २३. अशी आमुची मुले

वडाच्या पारंब्या लोंबतात, लोंबतात
त्यांचेच झोपाळे झुलतात, झुलतात
झुलत्या झोपाळ्यांवर बसतात, बसतात
अशी आमुची मुले, रानची फुले

धीट बाई धिटुकली, धिटुकली
भीत नाहीत पिटुकली, पिटुकली



छोटे-मोठे डोंगर चढतात, चढतात
कोल्होबाच्या मागे धावतात, धावतात
लांडग्याची खोड मोडतात, मोडतात
अशी आमुची मुले, रानची फुले

धीट बाई धिटुकली, धिटुकली
भीत नाहीत पिटुकली, पिटुकली

भरभर झाडावर चढतात, चढतात
खणखण कुदळीने खणतात, खणतात





रोपांची लावणी करतात, करतात
अशी आमुची मुले, रानची फुले

धीट बाई धिटुकली, धिटुकली
भीत नाहीत पिटुकली, पिटुकली



उन्हातान्हात हिंडतात, हिंडतात
वाऱ्यापावसांत भिजतात, भिजतात
थंडीचा कडाका सोसतात, सोसतात
अशी आमुची मुले, रानची फुले

धीट बाई धिटुकली, धिटुकली
भीत नाहीत पिटुकली, पिटुकली

**खोड मोडणे** – फजिती करणे, वाईट सवय घालवणे.
**थंडीचा कडाका** – थंडीचा जोर.

**प्रश्न :**

१. रानची फुले असे कोणाला म्हटले आहे? २. या मुलांची धिटाई कोण-कोणत्या गोष्टींत दिसते? ३. वडाच्या पारंब्या लोंबतात, लोंबतात—त्यांचेच झोपाळे झुलतात, झुलतात—या ओळी वाचल्यावर डोळ्यांपुढे एक चित्र दिसू लागते. ही कविता वाचताना अशी आणखी कोणती चित्रे तुम्हांला दिसतात? ४. या कवितेतील आपल्या भावंडांबद्दल पाच वाक्ये लिहा.

## २४. धाडसी फेलिसिटा

आपण महाराष्ट्रात राहतो. महाराष्ट्र हे एक राज्य आहे. अशी अनेक राज्ये आपल्या भारतात आहेत. ओरिसा हे त्यांपैकीच एक राज्य आहे. या ओरिसा राज्यात घडलेली ही गोष्ट आहे.

गोष्ट आहे एका शूर, धाडसी मुलीची. या मुलीचे नाव आहे फेलिसिटा. पण लोक तिला प्रेमाने 'फेली' असे म्हणत.

ओरिसा राज्यात खूप नद्या आहेत. सरोवरेही आहेत. सरोवर म्हणजे खूप मोठे तळे. अशा सरोवरातून पलीकडे जायचे तर नावेतून जावे लागते.

त्या दिवशी असे घडले —

बरेच लोक सरोवराच्या काठी जमले होते. पलीकडे जाण्यासाठी ते नावेची वाट बघत होते. नाव काठाला येताच जमलेले सगळे लोक नावेकडे धावले. भराभर ते नावेत चढू लागले. नाव लहान होती. लोकांची ही गर्दी पाहून नावाडी म्हणाला, "बस! पुरे पुरे. आता कोणी चढू नका."

नावाड्याचे कोणीच ऐकले नाही. सगळेच्या सगळे लोक नावेत चढून बसले. फेलीही त्याच नावेत होती.

नावाड्याने नाव सोडली. गर्दीमुळे नावेत ओझे फार झाले. नावाड्याला ती नीट चालवता येईना. जिकडे ओझे

जास्त होई तिकडे ती कलू लागली. तशात जोराचा वारा सुटला. नाव अधिकच हेलकावे खाऊ लागली. जोराच्या वाऱ्याने लाटांवर लाटा उसळू लागल्या. ती आता उलटते की काय असे वाटू लागले. नावेतले सगळे लोक घाबरले. फेली मात्र घाबरली नाही. लोकांना ती म्हणाली, "नावेतली गर्दी कमी करायला हवी. ती कमी झाली तरच धोका टळेल. ज्यांना पोहता येते त्यांनी पाण्यात उड्या टाकाव्या." असे म्हणून तिने लगेच स्वतः पाण्यात उडी घेतली.

इतरांनी हे धाडस केले नाही. हेलकावे खाणाऱ्या नावेत ते तसेच बसून राहिले. जोराच्या वाऱ्याने नाव एका बाजूला एकदम कलली. त्याबरोबर त्यातून एक माणूस खाली पाण्यात पडला. तो गटांगळ्या खाऊ लागला. तो आता बुडतो की काय असे फेलीला वाटले. त्याला वाचवावे कसे हा तिला प्रश्न पडला. एवढ्यात लाकडाचा एक ओंडका जवळून वाहत चाललेला तिला दिसला. चपळाईने हात मारून तिने तो ओंडका पकडला. जलदीने पोहत ती त्या माणसाकडे गेली.



ओंडका तिने त्या माणसाच्या हाती दिला. ओंडक्याचा आधार मिळताच त्या माणसाला धीर आला. त्याला धरून तो पाण्यात तरंगू लागला. एवढ्यात आणखी एक मुलगा नावेतून पाण्यात पडला. तोही गटांगळ्या खाताना तिला दिसला.

झपाझप हात मारत फेली त्या मुलापाशी पोचली. तिने त्याला पकडले. आपल्या एका हाताचा आधार देऊन त्यालाही ती त्या ओंडक्याजवळ घेऊन आली. त्या ओंडक्याच्या आधाराने ते दोघेही कसेबसे पाण्यावर तरंगू लागले. त्यांना पोहता येत नव्हते हे तिच्या लक्षात आले. लोकांच्या मदतीची तिला गरज वाटली. सरोवराच्या काठाकडे तिने पाहिले. काही लोक तिथे उभे असलेले दिसले. त्यांची मदत घेण्यासाठी ती झपाझप हात मारत सरोवराच्या काठी आली.

ती खूप दमली होती. तिला धड बोलताही येत नव्हते. तिने कसेबसे हे सगळे लोकांना सांगितले. ते ऐकताच एका होडीत दोर घेऊन काही तरुण मदतीसाठी निघाले. बघता बघता ही होडी त्या लाकडाच्या ओंडक्याजवळ आली. त्यांनी दोर ओंडक्याकडे फेकला. त्या दोघांनाही त्यांनी ओढून होडीत घेतले. फेलीमुळेच आपला जीव वाचला याचा त्या दोघांना फार आनंद झाला.

फेलीच्या या धाडसाचे लोकांना फार कौतुक वाटले. तिच्या गावच्या लोकांना तर फारच आनंद झाला. फेलीच्या या

घाडसाची बातमी गावोगाव पसरली. तशीच ती दिल्लीलाही पोचली. २६ जानेवारीला दिल्लीला येण्यासाठी फेलीला बोलावणे आले.

२६ जानेवारी म्हणजे भारताचा प्रजासत्ताक दिन. या दिवशी दिल्लीत एक समारंभ केला जातो. या समारंभात दरवर्षी आपल्या देशातल्या अशा शूर, धाडसी मुलांचा गौरव केला जातो.

२६ जानेवारीच्या या समारंभास फेली दिल्लीला गेली. भारताच्या पंतप्रधानांनी फेलीची पाठ थोपटली. तिला पदक देऊन तिच्या धाडसाचे आणि शौर्याचे कौतुक केले.

फेलीसारख्या मुलामुलींचा कुणाला अभिमान वाटणार नाही ?





**प्रश्न :**

१. ही गोष्ट भारतातल्या कोणत्या राज्यात घडली आहे? २. सरोवराच्या काठी लोक का जमले होते? ३. नावाड्याला नाव चालवणे कठीण का झाले? ४. फेलीने नावेतून पाण्यात उडी का घेतली? ५. फेलीने दोघांचा जीव कसा वाचवला? ६. फेलीने दाखवलेल्या धाडसात तिचे आणखी कोणते गुण दिसून येतात?



## २५. हंस कोणाचा?

(शुद्धोदन नावाचा राजा पाटलीपुत्र येथे राज्य करत होता. गौतम हा त्याचा मुलगा. देवदत्त हा गौतमाचा दूरचा भाऊ. गौतमाच्या बालपणी घडलेली ही गोष्ट आहे.

छोटा गौतम एक दिवस बागेत रमत-गमत चालला होता. एवढ्यात त्याला एक सुंदर हंस आकाशात उडताना दिसला. त्याच्याकडे पाहत तो स्वतःशीच बोलू लागतो.)

गौतम : अहाहा! किती सुंदर हंस आहे हा! वा, वा! किती डौलानं उडतोय!

(छोटा गौतम त्याच्याकडे पाहतच उभा राहतो. एवढ्यात सूं-सूं करत एक बाण कुठून तरी येतो. तो हंसाला लागतो. हंस तडफडत खाली कोसळतो. छोटा गौतम 'अरेरे!' असे म्हणत धावत जातो. त्या जखमी पक्ष्याला उचलून जवळ घेत तो म्हणतो....)

गौतम : अरेरे! कुणी दुष्टानं तुला हा बाण मारला? थांब हं.

(असे म्हणून हलक्या हाताने बाण बाहेर काढत....)



अरेरे, तुझं हे पांढरं शुभ्र अंग रक्तानं अगदी भिजून गेलं आहे. थांब, तुला थोडं पाणी पाजतो. पाणी प्याल्यानं तुला थोडी हुशारी येईल.

(त्याला उचलून घेतो. पाण्याच्या हौदाकडे जातो. त्या हंसाला पाणी पाजतो. एवढ्यात देवदत्त तिथे धावत येतो.)

देवदत्त : गौतमा, तो हंस माझा आहे. दे तो इकडे.

गौतम : हा हंस तुझा कसा?

देवदत्त : मी त्याला बाण मारला आहे. त्याची शिकार मी केली आहे. तो हंस माझा आहे.

गौतम : तू त्याला बाण मारून जखमी केलं आहेस; पण मी त्याला सांभाळणार आहे. तुझ्या बाणानं झालेली जखम मी बरी करणार आहे.

देवदत्त : गौतमा, बऱ्या बोलानं माझा हंस मला परत दे.

गौतम : तो तुझा कुठला ? तो तुझाही नाही की माझाही नाही.

देवदत्त : शिकार मी केली आहे; म्हणून तो माझा आहे.

गौतम : मी त्याला वाचवलं आहे. त्याला सांभाळून मी बरं करणार आहे.



देवदत्त : तुझी नसती बडबड मला नको आहे. माझा हंस तू मुकाट्यानं देणार आहेस की नाही ? बोल.

(असे म्हणून देवदत्त गौतमाच्या अंगावर धावून जातो.)

गौतम : देवदत्ता, असा अंगावर धावून का येतोस ? वाटल्यास आपण महाराजांकडे जाऊ आणि त्यांनाच विचारू.

देवदत्त : चल, चल. शिकार मी केली आहे. महाराज तो हंस मलाच देतील.

(असे म्हणून त्याच्या हाताला धरून ओढू लागतो. गौतम शांतपणाने म्हणतो....)

गौतम : अरे, माझ्या हाताला धरून असा ओढतोस का ? या हंसाला मला नीट घेऊ दे. मी येतोच आहे.

(दोघे निघतात. गौतमाने हंसाला छातीशी धरले आहे. देवदत्त छाती पुढे काढून तोऱ्यात निघाला आहे.)

## प्रवेश दुसरा

(शुद्धोदन महाराजांचा दरबार. महाराज सिंहासनावर बसले आहेत. त्यांच्या शेजारी प्रधानजी उभे आहेत. एवढ्यात देवदत्त व गौतम प्रवेश करतात.)

प्रधान : महाराज, राजपुत्र दरबारात येत आहेत.

शुद्धोदन : (दरबारात प्रवेश करणाऱ्या राजपुत्रांकडे पाहत) यावं बालराजे! बागेत खेळायचं सोडून बालराजांनी दरबारात येण्याचं कारण?

देवदत्त : (गौतमाकडे रागाने बघत) महाराज, तसंच कारण घडलं आहे; म्हणून आलो आहोत आम्ही.



महाराज : म्हणजे तुम्हा दोघांत काही भांडण झालेलं दिसतंय. देवदत्तानं काही खोडी केली का, गौतम?

देवदत्त : महाराज, खोडी मी नाही केली. खोडी केली ती या गौतमानं.

महाराज : (आश्चर्याने) गौतमानं!

देवदत्त : महाराज, मी या हंसाची शिकार केली; पण माझी शिकार तो मला देत नाही.

महाराज : अरे, मग त्याचा हंस तू त्याला देत का नाहीस?

गौतम : महाराज, देवदत्तानं या हंसाला मारलं; पण मी त्याला वाचवलं आहे.

देवदत्त : महाराज, शिकार मी केली आहे; हंस मलाच मिळाला पाहिजे.

गौतम : महाराज, या जखमी हंसाच्या अंगातला बाण मी काढला. पाणी पाजून मी त्याला वाचवले. जो मारतो त्याचा हंस, की वाचवतो त्याचा? आपणच सांगावं.

महाराज : तुम्हा दोघांचंही म्हणणं मी ऐकलं. देवदत्ता, तू हा हंस आपला म्हणतोस ना? अरे, मग ज्याला आपण आपला म्हणतो, त्याला आपण लळा लावतो; त्याच्यावर माया करतो. त्याला ठार मारत नसतो. गौतमानं हंसाला वाचवलंय. ते पहा, तो हंस त्याला कसा बिलगलाय. हा हंस तुझा कसा?

गौतम : महाराज, तो मलाही नको आहे. तो बरा व्हावा आणि पूर्वीप्रमाणेच त्यानं आनंदानं राहावं हीच माझी इच्छा आहे.

महाराज : ठीक आहे. गौतमा, तुझा विचार मला आवडला. हंस तुझ्याकडेच राहील. तू त्याला बरं कर आणि सोडून दे. जिवदानापेक्षा या जगात आणखी चांगली गोष्ट ती कोणती आहे ?

प्रधान : महाराजांचा जयजयकार असो !

देवदत्ताखेरीज सर्वजण : महाराजांचा जयजयकार असो !

(देवदत्त रागाने पाय आपटत निघून जातो.)



बऱ्या बोलानं – तक्रार न करता. तोऱ्यात – ऐटीत. जिवदान – जीव वाचवणे. लळा लावणे – मायेने आपलेसे करणे.

**प्रश्न :**

१. हंसाला बाण कोणी मारला? २. हंस खाली पडल्यावर गौतमाने काय केले? ३. देवदत्त व गौतम हे दोघे महाराजांकडे का गेले? ४. महाराजांना कोणते विचार पटले? ५. शेवटी महाराजांनी हंस गौतमाला का दिला?

## २६. इच्छा



रोज वाटे एका फुला
कधी उडता येईल मला ?
हवं तिथं जाता येईल
भारी भारी मज्जा होईल.
पाकळी पाकळी लागता पसरू
फूलच झालं फुलपाखरू
इकडून तिकडे उडत जाता
कोण त्याला अडविल आता ?

एक वात मिणमिणत
मनात असे गुणगुणत
जर का मला उडता येईल
भारी भारी मज्जा होईल.
गुंगत असता सुटलं भान
वातीला फुटले पंख छान
राहील आता कशी घरात
काजवा होऊन गेली वात.





पडल्या जागी तळ्यातलं पाणी
एकच विचार मनात आणी
आमचा आपला तळ खाली

पक्षी तेवढे उंच आभाळी
म्हणून त्याची वाफ झाली
तळं सोडून वर निघाली
वाफेला मग पंख फुटले
ढग होऊन पळत सुटले.





मलाहि वाटतं घोडा व्हावं
माळावरून दौडत जावं
कधी वाटतं होऊन मासा
पाण्यात पोहत राहीन खासा.
कधी वाटतं पक्षी व्हावं
आकाशातून उंच उडावं
कधीच नाही का होणार असं
जसं मनात येतं तसं ?

गुंगणे – विचारात गढून जाणे, तल्लीन होणे.
भान सुटणे – आठवण न राहणे, लक्ष नाहीसे होणे.

**प्रश्न :**

१. आपल्याला उडता यावे असे फुलाला का वाटे? २. फुलाचे फुलपाखरू केव्हा झाले? ३. वात मनात काय गुणगुणत असे? ४. 'राहील आता कशी घरात'–असे का म्हटले आहे? ५. तळ्यातल्या पाण्याची वाफ का झाली? ६. कवितेतील मुलाला कोण-कोण व्हावे असे वाटते? ७. 'जसं मनात येतं तस कधीच होत नाही,' असे मुलाला का वाटते?



# २७. देह अपंग, मन अभंग

मार्च महिन्याचा तिसरा रविवार. या दिवसाला एक विशेष महत्त्व आहे. या दिवशी जगभर अपंगदिन साजरा केला जातो.

आज अपंगदिन होता. शाळेच्या पटांगणावर अपंगांचे सामने होणार होते. अपंग म्हणजे शरीराने अधू असलेले लोक. कुणी आंधळे, कुणी पांगळे, कुणी थोटे. असे हे लोक खेळ तरी कोणते खेळणार, असे रमेशला कोडे पडले होते. त्यांचे सामने पाहायला तो फार उत्सुक होता.

रमेश आपल्या बाबांबरोबर हे सामने पाहायला शाळेच्या पटांगणावर आला. पटांगणावर मोठा मंडप घातलेला होता. सभोवार पताका आणि तोरणे लावली होती. तालासुरांवर बँड वाजत होता. सामने पाहण्यासाठी लोकांनी गर्दी केली होती.

सामन्यांची वेळ झाली. अपंग खेळाडू मंडपातून मैदानावर येऊ लागले. रमेशाचे डोळे खेळाडूंकडे लागले. हे सगळे खेळाडू

कुबडया घेऊन मैदानात आले. रमेशचे बाबा म्हणाले, "रमेश, हे सारे खेळाडू पांगळे आहेत. आता त्यांची धावण्याची शर्यत सुरू होईल."

रमेश मोठ्या उत्सुकतेने पाहू लागला. सर्व खेळाडू एका रेषेत उभे राहिले. 'एक, दोन, तीन' असे पंचाने म्हणताच धावण्याची शर्यत सुरू झाली. कुबडया घेतलेली मुले धावू लागली. पायाने अधू असूनही किती वेगाने धावत होती ती! रमेश चकित होऊन बघत राहिला. लोक आनंदाने ओरडू लागले, "शाबास, शाबास! धावा, पळा."

धावता धावता काही मुले पडली; पण ती हसत उठून धावू लागली. सगळ्यांना त्यांचे फार कौतुक वाटले. धावण्याची शर्यत संपली. विजयी खेळाडूंचे लोकांनी टाळ्या वाजवून कौतुक केले.

मैदानावर आता दुसरे खेळाडू आले. ते सर्व खुर्च्यांवर बसलेले दिसत होते. त्यांना पाहून रमेशने विचारले, "बाबा, हे असे खुर्च्यांवरून का आले?"

बाबा म्हणाले, "अरे दोन्ही पायांनी ते अधू आहेत. कुबडया घेऊनही त्यांना चालता येत नाही. चाकांच्या खुर्च्यांवर बसूनच ते सारी कामे करतात. आता आपण त्यांची शर्यत पाहू या."

'एक, दोन, तीन' असे म्हणताच शर्यत सुरू झाली. खुर्च्यांवर बसलेले खेळाडू हातांनी जोरजोराने चाके फिरवू

लागले. खुर्च्या वेगात धावू लागल्या. रमेशला मोठे नवल वाटले. बघता-बघता शर्यत संपली. टाळ्यांचा कडकडाट झाला. रमेशनेही आनंदाने टाळ्या वाजवून उड्या मारल्या.

ही शर्यत संपली आणि अंध मुले कबड्डी खेळायला मैदानात उतरली.

रमेशने आश्चर्याने विचारले, "हे सर्वजण अंधळे असून कबड्डी हो कशी खेळणार?"

बाबा म्हणाले, "पहाच ना आता!"

सामना सुरू झाला. लोक आश्चर्याने बघत राहिले. हे सर्व खेळाडू अंधळे असूनही कबड्डी कशी छान खेळत होते. डोळे नसून असल्यासारखे. ते सावधपणे चाल करत होते, साखळी करून गड्याला आत घेत होते. त्यातूनही काही चलाख खेळाडू अचूक गडी टिपत होते. सामना मोठा चुरशीचा झाला.

सामने संपले आणि बाबा म्हणाले, "रमेश, शाळेच्या इमारतीत तिकडे लोक जात आहेत. चल. तिथे काय आहे ते पाहू."

ते दोघे तिकडे गेले. शाळेच्या एका मोठ्या वर्गात सुंदर, सुंदर अशा कितीतरी वस्तू मांडलेल्या होत्या. पिशव्या, बटवे, खेळणी, सतरंज्या, गालिचे अशा अनेक प्रकारच्या वस्तू तेथे दिसत होत्या. या सर्व वस्तू अपंगांनीच तयार केलेल्या होत्या.

शेजारच्या वर्गात दोन अपंग मुले चित्रे काढण्यात दंग

झाली होती. त्यांना हात नव्हते. त्यांतील एकजण पायाच्या बोटांत कुंचला धरून चित्र काढत होता. दुसरा तोंडात कुंचला धरून एक चित्र रंगवत होता. हे पाहून रमेश थक्कच झाला.

रमेशच्या बाबांनी एक सुंदर पिशवी व एक खेळणे रमेश-साठी विकत घेतले. तेथून बाहेर पडता पडता रमेशचे बाबा म्हणाले, "रमेश, पाहिलेस ना सारे हे? हे अपंग असून किती आनंदी आहेत! त्यांचा देह अपंग असला तरी त्यांचे मन अभंग आहे, खंबीर आहे. हे पाहून असे वाटते — आपण धडधाकट असूनही जणू अपंग आहो; आणि हे अपंग असूनही धडधाकट आहेत!"



देह – शरीर. अभंग – न मोडणारे, खंबीर. कुबडी – पांगळा मनुष्य चालण्या-साठी काखेत आधाराला घेतो ते लाकडी साधन. अचूक – नेमका, बरोबर. टिपणे – खेळात विरुद्ध बाजूच्या गड्याला शिवणे.

**प्रश्न :**

१. रमेशला कोणते कोडे पडले होते? २. अपंगांचे कोणकोणते सामने झाले? ३. सामने पाहताना रमेशला आश्चर्य का वाटत होते? ४. अपंगांनी तयार केलेल्या कोणकोणत्या वस्तू तेथे मांडल्या होत्या? ५. हात नसतानाही मुले चित्रे कशी काढत होती? ६. 'आपण धडधाकट असूनही जणू अपंग आहोत,' असे रमेशचे बाबा का म्हणाले?



## २८. कोणासाठी ?...बाळासाठी !

गोष्ट आहे शिवाजी महाराजांच्या वेळची. रायगडावर घडलेली. तो दिवस होता कोजागरी पौर्णिमेचा. रायगडावर मोठा समारंभ होता. गवळी दूध घेऊन गडावर चालले होते. काही गवळणीही निघाल्या होत्या.

गडाखाली एक छोटे गाव होते. त्या गावात हिरा नावाची एक गवळण राहत होती. तिलाही आज दूध घेऊन गडावर जायचे होते. धारा काढल्या होत्या. चरव्या दुधाने भरून ठेवल्या होत्या; पण बाळ झोपल्याशिवाय तिला बाहेर पडता येत नव्हते.

तेवढ्यात एक गवळण तिथे आली. ती हिराला म्हणाली, "अग, झाले की नाही तुझे? चल ना."

हिरा म्हणाली, "तू हो पुढे. अजून माझे तान्हे झोपायचे आहे. त्याला झोपवते आणि मग मी निघते."

हिराला बोलवायला आलेली गवळण पुढे निघून गेली. हिराने बाळाला पाळण्यात घातले. बराच वेळ ती झोके देत उभी राहिली. अखेर एकदाचे तिचे बाळ झोपले. मग दुधाने भरलेल्या चरव्या घेऊन हिरा घराबाहेर पडली. निघण्यापूर्वी शेजारच्या आजीला ती म्हणाली, "जरा बाळाकडे बघा.

झोपलाय तो. एवढे दूध गडावर विकून दिवस मावळायच्या आत येतेच."

निघायला आधीच उशीर झाला होता. झपाझप पावले टाकत ती गड चढू लागली. ती गडावर पोहोचली तेव्हा इतरांनी आपले सगळे दूध विकले होते. विकत घेणारेही कोणी दिसत नव्हते. दूध विकायला बराच वेळ लागला. दिवस केव्हा मावळला हे तिच्या लक्षातही आले नाही. दिवस मावळलेला पाहून तिच्या मनात आले — गडाचे दरवाजे बंद तर झाले नसतील? दरवाजे बंद झाले तर घरी कसे जाता येईल? मी घरी गेले नाही तर घरातल्या बाळाची काळजी कोण घेईल?



बाळाच्या ओढीने ती घाईघाईने निघाली. मुख्य दरवाजाशी ती आली, गडाचा दरवाजा बंद झाला होता. लगेच ती चौकीदाराकडे गेली. त्याला कळवळून म्हणाली, "बाबा, मी हात जोडते. दरवाजा उघडा. मला घरी जाऊ द्या. माझे बाळ घरी एकटेच आहे."

चौकीदार म्हणाला, "मला दरवाजा उघडता येणार नाही. गडावरचे दरवाजे दिवस मावळायला बंद होतात; आणि ते

दिवस उगवायला उघडतात. महाराजांचा तसा हुकूमच आहे."

हिराने त्याची पुन्हा-पुन्हा विनवणी केली. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. काय करावे ते तिला कळेनासे झाले. कोठून खाली उतरता येईल का, याचा विचार करत ती इकडे तिकडे पाहू लागली. वाट शोधण्यासाठी ती गडावर फिरू लागली. या बुरुजाकडे जा, त्या बुरुजाकडे जा, अशी ती पुष्कळ फिरली. वाट काही दिसेना. तिच्या डोळ्यांसमोर तिचा बाळ दिसू लागला. मग मात्र तिला राहवेना. ती निघाली. काहीही करून गड उतरायचाच असे तिने ठरवले. एका कड्या-जवळ ती आली. बाळाच्या ओढीने ती कशीबशी कडा उतरू लागली.

मध्येच तिचा पाय घसरत होता. ती पडत होती; पण उठून पुन्हा गड उतरत होती. एके ठिकाणी तिचा पाय निसटला : पण झाडाच्या एका फांदीने तिला सावरले. काही झाले तरी ती थांबली नाही. अखेर एक अतिशय अवघड कडा उतरून ती खाली आली. गड उतरल्यावर तिला कोण आनंद झाला!



बाळाला भेटण्यासाठी ती धावतच सुटली.

ती घरी आली. बाळ रडत होते. आजीच्या मांडीवरून तिने बाळाला उचलून घेतले. त्याला पोटाशी धरून कुरवाळले. त्याचे पटापट पापे घेतले. आईला पाहून बाळ हसू लागले.

पुढे ही हकीकत शिवाजी महाराजांना कळली. हिराच्या या धाडसाचे त्यांनाही नवल वाटले. त्यांनी तिला बोलावून घेतले. तिला मोठे बक्षीस देऊन तिचे कौतुक केले.

हिराने हे किती मोठे धाडस केले होते! कोणासाठी? आपल्या बाळासाठी! ज्या कड्यावरून हिरा गड उतरून खाली गेली तेथे महाराजांनी एक बुरूज बांधला. तो आजही रायगडावर आहे. 'हिरकणीचा बुरूज' म्हणतात तो हाच.



**कोजागरी पौर्णिमा**–आश्विन महिन्यातील पौर्णिमा. **चरवी**–दुधासाठी वापरण्याचे वाटोळ्या आकाराचे मोठे भांडे. **चौकीदार**–पहारेकरी. **कडा**–डोंगराची कड, सुळका. **कोण आनंद होणे**–फार आनंद होणे.

**प्रश्न :**

१. रायगडावर जायला हिराला उशीर का झाला? २. दिवस मावळल्यावर तिला कशाची भीती वाटली? ३. ती चौकीदाराकडे का गेली? ४. चौकीदाराने तिला काय सांगितले? ५. गड उतरण्यासाठी तिने काय केले? ६. शिवाजी महाराजांनी तिचे कौतुक का केले? ७. 'हिरकणीचा बुरूज' असे नाव का पडले?



## २९. गाडगेबाबा

गाडगेबाबा गावोगाव फिरत. आज इथे तर उदया तिथे. ते जातील तिथे लगेच त्यांच्याभोवती लोक गोळा होत. ते दिसले रे दिसले की 'गाडगेबाबा आले, गाडगेबाबा आले' असा एकच गलका होई. मग कोणी पाया पडायला पुढे जाई. बाबा त्याला एक रट्टा देऊन म्हणत, "माणसाने माणसाच्या पाया कशाला पडायचे ? अरे, त्यापेक्षा काही चांगले काम करा."

आपल्याभोवती गोळा झालेल्या लोकांना ते म्हणत, "नुसते माझ्याकडे बघत उभे राहू नका. आजूबाजूला बघा. खराटे आणि पाट्या घेऊन या." बाबांच्या बोलण्याचा अर्थ त्यांना कळत नसे. ते नुसते त्यांच्याकडे बघत राहत. बाबा म्हणत, "मी काय सांगतो हे समजत नाही का ? अरे बाबांनो, जा, खराटे आणि पाट्या घेऊन या."

लोक म्हणत, "बाबा, खराटे आणि पाट्या कशासाठी ?"

बाबा म्हणत, "बघा आजूबाजूला. किती हा कचरा ! किती

ही घाण! तुम्ही या अशा घाणीतच कसे राहता?"

लोक म्हणत, "आम्ही असेच राहतो!"

"मग अशा राहणीनं रोग होतात कीं नाही?"

"होतात."

"पटकी होते की नाही?"

"होते."

"मग तुम्ही काय करता?"

लोक सांगत, "पटकीची साथ आली म्हणजे मग आम्ही मरीआईचा गाडा ओढतो."

"मरीआईचा गाडा ओढून पटकी जाते काय?"

लोकांना उत्तर देता येत नसे. मग बाबा म्हणत, "अरे, गाडा कसला ओढता? ही गाडाभर घाण झालीय ती बाजूला करा."

लोकांना बाबांचे म्हणणे पटे. ते खराटे आणि पाट्या घेऊन येत. बाबा स्वतः एक खराटा घेत आणि झाडू लागत. इतर माणसेही झाडू लागत. काही चुकारपणा करत.

बाबा मधूनच ओरडत, "खाली वाका. गड्यांनो, खराटा आडवा सरपटून चालू द्या. कचरा मागे सोडू नका. अरे ए, कोण तू? तो शेजारचा जवान बघ. त्याचा खराटा कसा जमिनीला भिडून चाललाय."

एवढ्यात कोणीतरी बाबांचे पाय धरू पाही. बाबा चिडून



म्हणत, "तुम्ही शहाणे नाही का हो? स्वतः तर काम करत नाही; पण दुसरे काम करून राहिले तर त्यांच्या कामात अडथळा आणता? सरा, बाजूला सरा. पाया कसले पडता? आधी पायाखालची घाण काढा."

मग झाडू भराभर फिरू लागत. पाट्या भराभर भरल्या जात. लोक त्या उचलून दूर खड्ड्यात टाकत. गाव स्वच्छ होई. अगदी आरशासारखे लखख!

बाबांना स्वच्छता आवडे. त्यांना घाण खपत नसे. जातील त्या गावात ते लोकांना विचारत, "तुमच्या गावात पाणवठा आहे का?"

"आहे की!"

"तिथेच आंघोळ करता की नाही?"

"करतो."

“कपडे धुता की नाही?”

“धुतो.”

“पाय धुळीने माखले म्हणजे तेच पाय त्या पाण्यात बुडवता की नाही?”

“बुडवतो.”

“मग तेच पाणी पिता?”

“पितो.”

“वा रे वा! गड्यांनो, गावचा पाणवठा हा आपला सगळ्यांचा. तो स्वच्छ नको का ठेवायला? अरे, चांगले पाणी प्या. घाण पाणी पिऊन नारू होतो की नाही?”

“होतो.”

“मग तीन-तीन महिने पाय धरून बसता की नाही?”

“बसतो.”

“वेड्यांनो, पाणी घाण करू नका. आपण सगळे जे पाणी पितो, ते स्वच्छ ठेवा.”

गाडगेबाबा असे गावोगाव जात. कीर्तन करत. चांगले वागा; चांगला विचार करा; गाव निर्मळ ठेवा असे ते सांगत.

**प्रश्न :**

१. गाडगेबाबा एखाद्या गावी गेले की लोक काय करत? २. त्यांच्या पाया पडणाऱ्या लोकांना बाबा काय म्हणत? ३. खराटे आणि पाट्या घेऊन यायला बाबा का सांगत? ४. पटकीची साथ आली की लोक काय करत? ५. ‘गावचा पाणवठा स्वच्छ ठेवा’, असे बाबा का सांगत?

# ३०. गाणी



## १. नाच रे मोरा

नाच रे मोरा, आंब्याच्या वनात
नाच रे मोरा, नाच!

ढगांशी वारा झुंजला रे
काळा काळा कापूस पिंजला रे
आता तुझी पाळी
वीज देते टाळी
फुलव पिसारा नाच

झर झर धार झरली रे
झाडांची भिजली इरली रे
पावसात न्हाऊ
काहीतरी गाऊ
करून पुकारा नाच

थेंब थेंब तळ्यात नाचती रे
टपटप पानांत वाजती रे
पावसाच्या रेघांत
खेळ खेळू दोघांत
निळ्या सौंगड्या नाच

पावसाची रिमझिम थांबली रे
तुझी माझी जोडी जमली रे
आकाशात छान छान
सात रंगी कमान
कमानीखाली त्या नाच

## २. या बाई या

या बाई या,
बकुळिच्या झाडाखाली फुले वेचू या.
ऊन पडले,
पानफूल दिसे कसे गोडगोडुले.
गोडगोडुले,
मोतियाचे दाणे कोणी खाली पाडिले ?
रान हालले,
पहाटेला शुकदेव गाणे बोलले.

## ३. आली दिपवाळी रे

भुईनळ्याचे झाड फुलांचे भिडे निळ्या आभाळी रे!
आली उजळित हासत फुलवित लक्ष दीप दिपवाळी रे!

जमला मेळा गोपाळांचा
धूमधडाका फटाकडयांचा

दिव्यादिव्यांची रांग शोभते सुंदर पहाटवेळी रे!
भुईनळ्याचे झाड फुलांचे भिडे निळ्या आभाळी रे!

ताई, भाऊ, नाचत या रे
मजेत आपण खेळू सारे

दिपवाळीचा सजवू किल्ला काढुनिया रांगोळी रे!
भुईनळ्याचे झाड फुलांचे भिडे निळ्या आभाळी रे!

अवतीभवती चंद्रज्योती
हसत उधळिती माणिक-मोती

हिरव्या, तांबुस, शुभ्र प्रकाशी उजळुन धरती सजली रे!
भुईनळ्याचे झाड फुलांचे भिडे निळ्या आभाळी रे!

आनंदाने गीत गात या
लाख दिव्यांच्या उजेडात या

खेळत देऊ एकामेका आनंदाने टाळी रे!
भुईनळ्याचे झाड फुलांचे भिडे निळ्या आभाळी रे!

